कनिष्ठ अभियंता/शाखा अभियंता/ सहाय्यक अभियंता श्रेणी-२ (गट-ब) संवर्गतील अधिकाऱ्यांच्या विनंतीनुसार बदल्या

**महाराष्ट्र शासन**

**उद्योग, उर्जा व कामगार विभाग**

**शासन आदेश क्रमांक: मुविनि-२०१७/प्र.क्र. १८५/ऊर्जा-५**

**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.**

**दिनांक : ३१ ऑगस्ट, २०१७.**

**वाचा:- शासन आदेश क्रमांक: मुविनि-२०१७/ प्र.क्र. १८५ / ऊर्जा-५ दि. ३१ मे, २०१७ .**

**शासन आदेश:-**

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडतांना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील कलम ४ (४) (दोन) व ४ (५) मधील तरतुदीनुसार विद्युत निरीक्षणालय शाखेतील अधिकारी/ कर्मचारी यांच्या बदल्यांचे अधिकार अधिसूचित केल्यानुसार, सक्षम प्राधिकाऱ्याच्या मान्यतेने, सार्वजनिक सेवेच्या हितार्थ खाली नमूद केलेल्या कनिष्ठ अभियंता/शाखा अभियंता/ सहाय्यक अभियंता श्रेणी-२ (गट-ब) संवर्गातील अधिकाऱ्यांची त्यांच्या विनंतीच्या अनुषगांने, बदली करण्यात येत असून त्यांची पदस्थापना त्यांच्या नावासमोर स्तंभ क्र. ४ मध्ये दर्शविलेल्या कार्यालयात करण्यात येत आहे:-

| अ.क्र. | अधिकाऱ्यांचे नावं व पदनाम | सध्याची पदस्थापना | बदलीनंतरची पदस्थापना | शेरा |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १. | श्री. राजेश भा. परदेशी<br>सहाय्यक अभियंता श्रेणी-२ | विद्युत निरीक्षक , निरीक्षण विभाग (उद्वाहन), मुंबई | विद्युत निरीक्षक, नाशिक | श्री. वि.के. देशमुख, शा.अ. यांच्या बदलीने होणाऱ्या रिक्त पदी विनंतीनुसार |
| २. | श्रीम. ए.ए. खामकर<br>सहाय्यक अभियंता श्रेणी-२ | विद्युत निरीक्षक, निरीक्षण विभाग कोल्हापूर | विद्युत निरीक्षक, (उद्वाहन), मुंबई पुणे युनिट | रिक्त पदी |
| ३. | श्रीम. प्र.रा.चापले<br>सहाय्यक अभियंता श्रेणी-२ | विद्युत निरीक्षक, निरीक्षण विभाग अहमदनगर | विद्युत निरीक्षक, पुणे कक्ष क्र १/२ | श्रीम. जी.एम. चौधरी स.अ.श्रे-२ यांच्या बदलीने होणाऱ्या रिक्त पदी विनंतीनुसार |

२. मुख्य विद्युत निरीक्षक, मुंबई यांनी बदली झालेल्या अधिकाऱ्यांना त्यांच्या नवीन नियुक्तीचे ठिकाणी त्वरीत कार्यभार घेता यावा म्हणून आवश्यक ती स्थानिक पर्यायी व्यवस्था करुन सध्याच्या पदभारातून तात्काळ कार्यमुक्त करावे व त्यांना नवीन नेमणूकीच्या जागी ताबडतोब रुजू होण्यास सांगावे. बदली झालेल्या अधिकाऱ्यास रजा मंजूर करु नये.

३. तसेच या आदेशान्वये करण्यात आलेल्या बदल्या रद्द करणे किंवा त्यात बदल करणे यासाठी राजकीय दडपण/दबाव आणल्याचे निदर्शनास आल्यास संबंधित कनिष्ठ अभियंता/शाखा अभियंता/ सहाय्यक अभियंता श्रेणी-२ (गट-ब) महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम, १९७९ अनुसार शिस्तभंगाची कारवाई सुरु करण्यात येईल.

४. संबंधित सहाय्यक अभियंता श्रेणी-२ यांनी बदलीच्या नवीन ठिकाणी तात्काळ रुजू होऊन तसा अनुपालन अहवाल शासनास सादर करावा.

हे शासन आदेश, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०९०११२५१५८३६१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

Bhimashankar Yallappa Manta

Digitally signed by Bhimashankar Yallappa Manta
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Industries,Energy And Labour Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=873ce9a279d9561ff0cbf658e05b823c67c79dcac309fc4ebdac035d6aeec2a0, cn=Bhimashankar Yallappa Manta
Date: 2017.09.01 12:42:19 +05'30'

**(भि. य. मंता)**
शासनाचे उपसचिव

**प्रति,**

१) मुख्य विद्युत निरीक्षक, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, प्रशासकीय इमारत, ३ रा मजला, रामकृष्ण चेंबूरकर मार्ग, चेंबूर (पू.) मुंबई-७१.

२) प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र नागपूर.

३) अधिदान व लेखा अधिकारी मुंबई/ निवासी लेखाधिकारी, मुंबई.

४) जिल्हा कोषागार अधिकारी

५) उपसचिव (ऊर्जा-५), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

६) संबंधित कनिष्ठ अभियंता/शाखा अभियंता/ सहाय्यक अभियंता श्रेणी-२ (गट-ब)

७) निवड नस्ती ऊर्जा-५.

**प्रत,**

१) मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव

२) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव

३) मा. मंत्री (ऊर्जा) यांचे खाजगी सचिव

४) मा. राज्यमंत्री (ऊर्जा) यांचे खाजगी सचिव

५) प्रधान सचिव (ऊर्जा) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.